**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नानिशा-२०२५/प्र.क्र.५३/का.१२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - १५ एप्रिल, २०२५

**वाचा** :- शासन निर्णय आदिवासी विकास क्र. शाआशा २००८/प्र.क्र. ८१/का. १३, दिनांक २८ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना :**

उच्च शिक्षणात प्रामुख्याने इंग्रजीचा वापर जास्त होत असल्याने अनुसूचित जमातीचे विद्यार्थी उच्च शिक्षणात मागे पडत असल्याने व उच्च शिक्षणाच्या बदललेल्या वातावरणात त्यांना जुळवून घेणे कठीत होत असल्याने दिनांक २८ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याची योजना सुरु करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत इंग्रजी माध्यमाच्या निवासी शाळांची निवड करण्यासाठी तसेच शाळेचे शुल्क ठरविण्यासाठी प्रधान सचिव, आदिवासी विकास यांच्या अध्यक्षतेखाली एक सचिव स्तरीय समिती गठीत करण्यात आली असून प्रधान सचिव, वित्त विभाग व सचिव, शालेय शिक्षण विभाग हे सदर समितीचे सदस्य आहेत. तथापी प्रधान सचिव, वित्त विभाग व सचिव, शालेय शिक्षण विभाग हे सदर समितीच्या बैठकांसाठी उपस्थित राहू शकत नसल्याने त्यांच्याऐवजी त्यांचे प्रतिनिधी सदर बैठकांना उपस्थित राहतात. यासंदर्भात महालेखापाल यांनी त्यांच्या अहवालामध्ये आक्षेप नोंदविलेला आहे. सदर बाब विचारात घेवून सदर समितीच्या रचनेत बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याच्या योजनेंतर्गत इंग्रजी माध्यमाच्या निवासी शाळांची निवड करण्यासाठी

तसेच शाळेचे शुल्क ठरविण्यासाठी गठीत करण्यात आलेल्या समितीमध्ये सुधारणा करुन खालीलप्रमाणे निवड समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, आदिवासी विकास विभाग | - | अध्यक्ष |
| २) | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, शालेय शिक्षण विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१५१५०३५७३५२४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARJERAO SHIVAJIRAO PATIL

Digitally signed by SARJERAO SHIVAJIRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2d080100db919af47f90e1db6e9619b378e138dc014065c22b0cdfe1cc5ccc38, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA89CF93AD925B079029AE4C36781C9345B874A8C0347351CB54D6CC08F5EC7A, cn=SARJERAO SHIVAJIRAO PATIL
Date: 2025.04.15 15:04:51 +05'30'

**( सर्जेराव पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१५. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१६. सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१७. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
१८. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१९.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
२०.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
२२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
२३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
२४. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय
२५. निवडनस्ती (का.१२)